**पाणीपुरवठा योजनांवरील रुपांतरीत नियमित अस्थायी (सीआरटी) आस्थापनेवरील कार्यरत/सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या वेतन थकबाकीसाठी संबंधित जिल्हा परिषदांना निधी वितरीत करण्याबाबत-लेखाशिर्ष २२१५१९१४**

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः जिपग्रा-१२२३/प्र.क्र.१०१/पापु-२३**

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीखः २९ एप्रिल, २०२५

**वाचा :-**

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः जिपग्रा-१९२०/प्र.क्र.१३५/पापु-२३, दिनांक- ३० जानेवारी, २०२३
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक- ७ जुलै, २०२५
३. शासन पत्र क्र. जिपग्रा-१२२३/प्र.क्र.१०१/पापु-२३, दिनांक १२ एप्रिल, २०२३.
४. शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक जिपग्रा-१२२३/प्र.क्र.१०१/पापु-२३, दिनांक- २५ जानेवारी, २०२४.
५. शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक जिपग्रा-१२२३/प्र.क्र.१०१/पापु-२३, दिनांक- १६ फेब्रुवारी, २०२४.
६. शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक जिपग्रा-१२२३/प्र.क्र.१०१/पापु-२३, दिनांक- १ जुलै, २०२४.
७. शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक जिपग्रा-१२२३/प्र.क्र.१०१/पापु-२३, दिनांक- २३ जानेवारी, २०२५.
८. शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक जिपग्रा-१२२५/प्र.क्र.०९/पापु-२३, दिनांक- ५ मार्च, २०२५.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांचे पत्र क्र.जा.क्र.जिपना/ग्रापापुवि/आस्था-२/३६६/२५, दिनांक- ३०.०१.२०२५.

**प्रस्तावना:-**

जिल्हा परिषदेंतर्गत ग्रामीण पाणीपुरवठा योजनांवरील रुपातंरीत नियमित अस्थायी (सीआरटी) आस्थापनेवरुन सेवानिवृत्त झालेल्या पात्र कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्ती वेतनासाठी शासनाकडून जिल्हा परिषदेला अनुदान देण्याचा धोरणात्मक निर्णय मंत्रीमंडळाने दिनांक १७ नोव्हेंबर, २०२२ च्या बैठकीमध्ये घेतला असून त्यानुषंगाने दिनांक ३० जानेवारी, २०२३ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. निधी अभावी ज्या कर्मचाऱ्यांचे वेतन/भत्तेविषयक,

सेनिवृत्तीवेतविषयक आर्थिक लाभ संबधित जिल्हा परिषदेने अद्याप अदा कलेले नाहीत, अशा प्रकरणी कर्मचारी निहाय अचूक परिगणनेसह थकबाकीच्या निधी मागणीचा प्रस्ताव संबंधित जिल्हा परिषदांनी शासनाकडे सादर करण्याची तसेच संबंधित कर्मचाऱ्यांच्या अनुज्ञेय थकबाकीच्या रकमा पुढील ५ वर्षांच्या कालावधीत टप्प्या-टप्प्याने अदा करण्याची तरतूद दिनांक ३०.०१.२०२३ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. त्यानुषंगाने कर्मचारीनिहाय थकबाकीची अचूक परिगणना करुन मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या स्वाक्षरीने व मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी प्रमाणित केलेल्या विवरणपत्रामध्ये माहिती सादर करण्याबाबत संबंधित जिल्हा परिषदांना संदर्भाधीन (३) च्या पत्रान्वये कळविण्यात आले आहे. त्यानुषंगाने ज्या जिल्हा परिषदांनी थकबाकीची सविस्तर अचूक माहिती सादर केली आहे, अशा जिल्हा परिषदांतर्गत कार्यरत/सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या वेतन थकबाकीचे अनुज्ञेय हप्ते म्हणून संबंधित जिल्हा परिषदांना निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-** जिल्हा परिषद, नांदेड यांनी संदर्भाधीन (९) येथील पत्रान्वये सादर केलेली थकबाकीची सविस्तर माहिती विचारात घेऊन या जिल्हा परिषदेंतर्गत २१ सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या वेतन थकबाकीच्या तीन हप्त्यापोटी नांदेड जिल्हा परिषदेला २२१५१९१४, ३६- सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टांतर्गत एकूण रुपये ७८,७८,०५३/- (अक्षरी रुपये अठ्ठयाहत्तर लाख अठ्ठयाहत्तर हजार त्रेपन्न फक्त) इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

२. उपरोक्त निधीतून ज्या कर्मचाऱ्यांना थकबाकीचे तीन हप्ते अदा करावयाचा आहे, अशा कर्मचाऱ्यांची यादी सोबतच्या सहपत्रामध्ये देण्यात आली आहे.

३. सदर निधी पुढील अटी व शर्तींच्या अधीन वितरीत करण्यात येत आहे.

अ) संबंधित कर्मचाऱ्यांच्या थकबाकीची परिगणना अचूक असल्याचे मुख्य कार्यकारी अधिकारी तसेच मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी प्रमाणित केल्याशिवाय जिल्हा कोषागाराने सदर देयक मंजूर करु नये. सोबतच्या सहपत्रातील सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या अनुज्ञेय वेतन थकबाकीसाठी या निधीचा वापर करावा. अन्य प्रयोजनासाठी या निधीचा वापर होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांची राहील.

ब)जिल्हा परिषदेने संदर्भाधीन (९) च्या पत्रान्वये कळविलेल्या थकबाकीच्या रकमांमध्ये भविष्यात कोणत्याही प्रकारची वाढ सूचवू नये, अशी वाढ शासनाकडून मान्य केली जाणार नाही.

क) संबंधित कर्मचाऱ्यांना यापूर्वी थकबाकीच्या रकमा अदा झाल्या नसल्याची खात्री करुनच या रकमा जिल्हा परिषदेने संबंधित कर्मचाऱ्यांना अदा कराव्यात.

ड)या थकबाकीच्या रकमेवर संबंधित कर्मचाऱ्यांना शासनाकडील निधीतून कोणतेही व्याज देय राहणार नाही.

इ)परिगणनेतील चूकीमुळे किंवा अन्य कारणांमुळे अधिकची रक्कम अदा झाल्याचे निदर्शनास आल्यास सदर रक्कम संबंधित कर्मचाऱ्यांकडून वसुल केली जाईल, अशा आशयाचे बंधपत्र संबंधित कर्मचाऱ्यांकडून जिल्हा परिषदेने प्राप्त करुन घ्यावे.

४. सदर सहायक अनुदान वेतनासाठी असल्याने वित्त विभागाच्या दिनांक १२.०१.२०२३ च्या शासन निर्णयानुसार ते "बिनशर्त" स्वरुपाचे आहे. तथापि पुढील हप्त्याच्या निधीची मागणी करताना उपरोक्त निधीतून कर्मचाऱ्यांना अदा केलेल्या रकमांचा कर्मचारी निहाय तपशील तसेच उपरोक्त अटींची पूर्तता केल्याचे प्रमाणपत्र संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी उपलब्ध करुन द्यावे.

५. विहित प्रयोजनाव्यतिरिक्त अन्य कारणांसाठी किंवा अन्य कर्मचाऱ्यांच्या थकबाकीसाठी सदर निधीचा वापर केल्याचे निदर्शनास आल्यास, या वित्तीय अनियमिततेसाठी जबाबदारी निश्चित करुन शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात येईल.

६. सदर प्रकरणी झालेल्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाशी वेळोवेळी ताळमेळ घ्यावा. ताळमेळाचे काम प्रलंबित असल्यास पुढील निधी वितरीत करण्यात येणार नाही. शासनाद्वारे देण्यात येणारे अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

७. वितरीत केलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी / शर्तींचे पालन करावे.

८. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेला खर्च "मागणी क्रमांक वाय-२, २२१५-पाणीपुरवठा व स्वच्छता, १९६-जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, (०१)- ग्रामीण नळ पाणीपुरवठा योजना, (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (अनिवार्य) (२२१५१९१४), ३६- सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२५-२६ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

९. संदर्भाधीन दिनांक ३०.०१.२०२३ च्या शासन निर्णयातील तरतूदींनुसार तसेच वित्त विभागाने संदर्भाधीन दिनांक ७.०४.२०२५ च्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागाला दिलेल्या अधिकारात बीम्स प्रणालीवर उपलब्ध केलेल्या निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे. वित्त विभागाच्या दिनांक ७.०४.२०२५ च्या परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२९१७२९४८६५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB B HAJARE

Digitally signed by BALASAHEB B HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB B HAJARE
Date: 2025.04.29 18:12:59 +05'30'

( बाळासाहेब बा. हजारे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड
मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड
जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा, नांदेड
वित्त विभाग, व्यय-३/ अर्थसंकल्प-१८ कार्यासन, मंत्रालय, मुंबई.
ग्रामविकास विभाग, आस्था-१० कार्यासन, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, पापु-४/पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई.
निवडनस्ती, पापु-२३.

शासन निर्णय क्रजिपग्रा-१२२३/प्र.क्र.१०१/पापु-२३, दिनांक २९ एप्रिल, २०२५

सोबतचे विवरणपत्र

| अ.क्र | सेवानिवृत्त कर्मचा-याचे नाव | पद | एकूण थकबाकी (रु.) | थकबाकीच्या एकूण तीन हप्त्यांची रक्कम (रु.) |
|---|---|---|---|---|
| १ | कै. सटवा शंकर सिलेवार | मजूर | २८५७८ | १७१४७ |
| २ | कै. प्रभाकर गंगाराम टिप्परसे | चौकीदार | १९१८६ | ११५१२ |
| ३ | कै. मारोती गणपती कल्याणकर | वॉलमन | २५८६४१ | १५५१८५ |
| ४ | कै. शंकर माणिक भरकडे | मजूर | ६०८५० | ३६५१० |
| ५ | कै. हरिबा बाबाराव बनबरे | चौकीदार | ४०४८१० | २४२८८६ |
| ६ | कै. बबन तुकाराम कंधारकर | मजूर | ४५३८२२ | २७२२९३ |
| ७ | श्री. पांडुरंग मनोहर रत्नपारखी | चौकीदार | ४६०३९४ | २७६२३६ |
| ८ | श्री. सदाशिव नागोराव पन्नसवाड | चौकीदार | १०५४३७२ | ६३२६२३ |
| ९ | श्री. अमजद बेग रजाबेग | चौकीदार | ७८३३०७ | ४६९९८४ |
| १० | श्री. महेबुब जलालसाब पठाण | चौकीदार | ६२२७२७ | ३७३६३६ |
| ११ | श्री. हनमंत दत्ता मलकापुरे | वॉलमन | ६८७६८७ | ४१२६१२ |
| १२ | श्री. शामराव काशिबा धोत्रे | चौकीदार | १३५१६३४ | ८१०९८० |
| १३ | श्री. रामराव लक्ष्मण भारती | वॉलमन | ६४४६६६ | ३८६८०० |
| १४ | श्री. संभाजी लक्ष्मण वाघमारे | चौकीदार | ७२३८३९ | ४३४३०३ |
| १५ | श्री. गोपीनाथ नरसिंह बिरादार | क. अभियंता | २२३०७७५ | १३३८४६५ |
| १६ | श्री. केवडा चंदर राठोड | मजूर | ११२१५८८ | ६७२९५३ |
| १७ | श्री. ताजोद्दिन फक्रोदिन | मजूर | ४३७७८५ | २६२६७१ |
| १८ | श्री. रामकिशन जयवंता मुसांडे | वॉलमन | २८५७० | १७१४२ |
| १९ | श्री. मारोती विरबाजी अंबुरे | मजूर | १००३६१७ | ६०२१७० |
| २० | श्री. शेषराव गंगाराम कदम | चौकीदार | ५३४९०२ | ३२०९४१ |
| २१ | श्री. परवेज अल्लाउद्दिन पठाण | चौकीदार | २१८३३८ | १३१००३ |
| | एकूण | | १३१३००८८ | ७८७८०५३ |

BALASAHEB B HAJARE

Digitally signed by BALASAHEB B HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT,
2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB B HAJARE
Date: 2025.04.29 18:12:23 +05'30'

बाळासाहेब बा. हजारे

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन